**वार्षिक योजना-२०१५-१६:** राज्य योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन या योजने अंतर्गत सोनसळ येथील श्री. चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थहावर कार्यरत असलेल्या ६ अतिरिक्त पदांच्या वेतन व भत्यांचा खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१५/प्र.क्र.१७०/फ-५**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३० जुलै, २०१५

वाचा:- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक- निसप-२०१५/प्र.क्र.३२/फ-५, दिनांक २४ फेब्रुवारी, २०१५.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र./प्र.क्र.१३३/(१३-१४)/८२०/२०१५-१६,दि.२७ जुलै,२०१५

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०.१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि.१७/०४/२०१५

**प्रस्तावना :-**

निसर्ग पर्यटन स्थळांचा विकास या योजनेतंर्गत सांगली जिल्हयातील कडेगांव तालुक्यातील मौजे सोनसळ येथील चौरंगीनाथ या पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१०/ प्र.क्र.१९८/शिकाना/फ-५, दि.२२/१२/२०१० अन्वये ६ अतिरिक्त पदांच्या (वनरक्षकांची २ व पहारेक-याची ४ ) निर्मितीस मंजूरी देण्यात आली आहे.

शासन निर्णय संदर्भ क्र. १ दि.२४/०२/२०१५ अन्वये सदरहू पदांना दि.१/३/२०१५ ते २९/२/२०१६ या कालावधीकरिता पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे. या पदांच्या वेतन भत्त्यावरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या वरील प्रस्तावास अनुसरुन वनरक्षकांची २ व पहारेकऱ्यांची ४ अशी एकूण ६ पदे निर्माण करण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

मौजे सोनसळ अंतर्गत श्रीचौरंगीनाथ, जि. सांगली येथील वन विभागाच्या अखत्यारीतील निसर्ग पर्यटन स्थळाच्या देखभालीसाठी मंजूर केलेल्या पदांच्या वेतन व भत्याचा खर्च भागविण्याकरिता खाली प्रमाणे उद्दिष्ठ निहाय अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उद्दीष्ट | रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|
| १ | ०१ वेतन | रु. १२.५३ |
| २ | ११ प्रवास खर्च | रु. ०.१२ |
| ३ | ५० इतर खर्च | रु ०.०३ |
| ४ | एकूण | रु. १२.६८ |

सदरहू खर्च सन २०१५-१६ करिता लेखाशिर्ष २४०६ वनिकरण व वन्यजीवन राज्य योजनातंर्गत योजना पंचवार्षिक योजनांतर्गत (०२)(०६) इको टूरिझम (राज्य) (२४०६ २२९५) अंतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७/४/२०१५ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७३०१७०८३७०११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DHAS ANIL N

Digitally signed by DHAS ANIL N
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917247, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DHAS ANIL N
Date: 2015.07.30 17:11:13 +05'30'

**(अनिल धस)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास)/(कार्मिक), म.रा.नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.
४) उप विभागीय वनाधिकारी, सांगली.
५) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
६) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, सांगली/कोल्हापूर
९) निवडनस्ती , फ-५ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२